**<u>राज्य योजना सन २०१८-१९</u>**
**निसर्ग संवर्धन व वन्यपशू व्यवस्थापनाबाबत (२४०६ ०७७५).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३० जुलै, २०१८.

<u>वाचा :-</u>

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
२. महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१ दिनांक १९.०५.२०१८
३. महसुल व वन विभाग शासन निर्णय शुध्दीपत्रक क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१ दिनांक ३१.०५.२०१८
४. महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१ दिनांक ३१.०५.२०१८
५. महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१ दिनांक ३०.०६.२०१८
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३/५२७/२०१८-१९, दिनांक २९.०६.२०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २०१८-१९ राज्यस्तरीय योजनाअंतर्गत निसर्ग संवर्धन व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १२००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. संदर्भिय पत्र क्रमांक ६ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी **रु.२०.२५ लक्ष** रक्कमेचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सदर शासन निर्णयान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये यावल व कळसूबाई हरिचंद्रगड अभयारण्याकरिता निसर्ग संवर्धन व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनांतर्गत शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास अनसरुन खालील अटींच्या अधीन राहून **रुपये २०.२५ लक्ष निधी** खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर होणारा खर्च सन २०१८-१९ मध्ये लेखाशीर्ष क्रमांक मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन ११०, वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तावित असलेल्या मोठ्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधित जबाबदारी नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

६. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक - १७.०४.२०१५ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३११७१२५४३३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.07.31 17:13:36 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
६. वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक
७. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.